**महाराष्ट्र लोक आयुक्त आणि उप लोक आयुक्त अधिनियम, १९७१ यात सुधारणा सुचविण्यासाठी व सक्षम लोक आयुक्त कायदा करण्यासाठी संयुक्त मसुदा समितीतील अशासकीय सदस्य व विशेष निमंत्रित यांच्या बैठकभत्त्याच्या दरात सुधारणा करणेबाबत .**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः- एलपीएल-१०१९/प्र.क्र.०९/कार्या.पंधरा**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय,मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : १४ फेब्रुवारी, २०२०.

<u>वाचा</u> :- १. शासन निर्णय क्रमांक एलपीएल-१०१९/प्र.क्र.०९/कार्या.पंधरा, दि.८ जुलै, २०१९.

महाराष्ट्र लोक आयुक्त आणि उप लोक आयुक्त अधिनियम, १९७१ मध्ये सुधारणा सुचविणे व सक्षम लोक आयुक्त कायदा करण्याच्या दृष्टीने विचारविनिमय करण्यासाठी तसेच सुधारित अधिनियमाचा मसुदा तयार करण्यासाठी गठीत करण्यात आलेल्या संयुक्त मसुदा समितीतील अशासकीय सदस्य व विशेष निमंत्रित यांना दैनिक भत्ता, बैठक भत्ता व प्रवास भत्ता मंजूर करण्यासाठी संदर्भिय शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आले आहे.

२. संदर्भिय शासन निर्णय दि.८.७.२०१९ अन्वये संयुक्त मसुदा समितीतील अशासकीय सदस्य व विशेष निमंत्रित यांना बैठक भत्ता दर रु.३००/-असा मंजूर केला आहे. सदर बैठक भत्त्याचा दर सुधारणा करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

३. सदर संयुक्त मसुदा समितीतील अशासकीय सदस्य व विशेष निमंत्रित यांना बैठक भत्त्याचा दर प्रति बैठकीसाठी रु.५००/-इतका निश्चित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या आनौपचारिक संदर्भ क्र.१००/सेवा-५, दि.२१/०१/२०२० च्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०२००२१३१११५०५८४०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Gupte Sanju
Kamlakar

Digitally signed by Gupte Sanju Kamlakar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=2834863d93dd5ba34736e8845b6287c3dd58ee176cf2b893df4e169e70699c59,
serialNumber=4c10e808fe85223e03be4cad0148cef9a71914878680c586fc438e7239dafca4, cn=Gupte Sanju Kamlakar
Date: 2020.02.14 16:01:10 +05'30'

**( संजू क. गुप्ते)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३. मा.मुख्य सचिव, मंत्रालय,मुंबई.

४. मा.राज्यमंत्री, सा. प्र. वि. यांचे स्वीय सहाय्यक.
५. अपर मुख्य सचिव (गृह विभाग), मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव (सेवा-सा.प्र.वि.), मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव (विधी व न्याय विभाग), मंत्रालय, मुंबई.
८. महालेखापाल (ले. व अ.) महाराष्ट्र-१,मुंबई.
९. महालेखापाल (लेखापरीक्षा),महाराष्ट्र-१, मुंबई.
१०. अधिदान व लेखा अधिकारी , मुंबई.
११. निवासी लेखा परीक्षा अधिकारी ,मुंबई.
१२. श्री. अण्णा हजारे (पत्राने)
१३. श्री. उमेशचंद्र सरंगी (पत्राने)
१४. श्री. विश्वंभर हनुमंतराव चौधरी (पत्राने)
१५. श्री. शामसुंदर आसावा (पत्राने)
१६. श्री. बाबासाहेब रामनाथ पठाडे (पत्राने)
१७. श्री. जॉनी जोसेफ (पत्राने)
**१८. निवड नस्ती.**